“महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना अनुदान वितरीत करण्याबाबत.

सन २०१८-२०१९ साठी लेखाशिर्ष (३६०४ ०९९८) खाली रक्कम रू.१४३६.१६ कोटी.(माहे नोव्हेंबर -२०१८ करीता)

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक- जीएसटी-२०१८/प्र.क्र.१९/न.वि.-३२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा :-

(१) वित्त विभाग महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग चार-ब, २९ जून,२०१७

(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने अधिसूचित केल्यानुसार संपूर्ण देशात वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी दिनांक १ जुलै, २०१७ पासून सुरू झाली आहे.त्यानुसार राज्यातही वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी सुरू झाली असून, भारताचे संविधानाच्या सातव्या अनुसूचीच्या सूची-दोन मधील (राज्य सूची) पूर्वीच्या नोंद ५२ अन्वये आकारण्यात व वसूल करण्यात येणारा प्रवेश कर, जकात, स्थानिक संस्था कर,उपकर किंवा इतर कोणताही कर बंद करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने स्थानिक प्राधिकरणास भरपाई देण्याबाबतचा महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ दिनांक १ जुलै,२०१७ पासून अंमलात येत असल्याबाबत संदर्भाधीन क्र. (१) अन्वये वित्त विभागाने महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध केले आहे.सबब, “महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना भरपाई अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

“महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील २६ महानगरपालिकांना सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ नुसार माहे नोव्हेंबर -२०१८ करीता **एकूण रक्कम रू. १४३६.१६ कोटी** इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेले हे अनुदान हे महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ मधील तरतूदीनुसार समायोजित करण्यात येईल.तसेच सदर अनुदानातून शासकीय व निमशासकीय संस्थाची येणी-देणी वसूल अथवा समायोजित करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही येईल.

३. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे महानगरपालिकांना वितरण करण्यासाठी श्री. कैलास म. बधान, उप सचिव, (न.वि.-५) यांना

नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्रीमती.शैलजा स. शिरोडकर, कक्ष अधिकारी, (नवि-५) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-४, मुख्य लेखाशिर्ष ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (०२) वस्तू व सेवा कराच्या अंमलबजावणीमुळे उद्भवणा-या महसूली तोट्याकरीता महानगरपालिकांना सहाय्य, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (३६०४ ०९९८) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२ एप्रिल,२०१८ मधील लागू होणा-या सर्व अटी व शर्थींची पूर्तता करण्यात आली आहे.

६. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२ एप्रिल, २०१८ व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३ दिनांक ३० जून, २०१७ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णयानुसार वितरीत करावयाच्या निधीची रक्कम ही ७०% च्या मर्यादेत आहे.

८. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२/अर्थ-१६ दिनांक २३ फेब्रुवारी, २०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१०५८१९४७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashikant Kashinath Sanap

Digitally signed by Shashikant Kashinath Sanap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15a77c0947426b11b7c7f646f29f3b1a483717eec6d16a0ebd196cbc7f25d62f, cn=Shashikant Kashinath Sanap
Date: 2018.10.29 11:06:59 +05'30'

**( शशिकांत का. सानप )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
३. सर्व आयुक्त, महानगरपालिका
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
५. सर्व विभागीय आयुक्त
६. संबधित जिल्हाधिकारी
७. मा.राज्यमंत्री (नगरविकास ) यांचे खाजगी सचिव
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,

९. अवर सचिव, नगरविकास विभाग, (नवि-४)
१०. कक्ष अधिकारी, तथा आहरण व संवितरण अधिकारी (नवि-५)
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१५. उप सचिव , कराधान-१ , वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
१६. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन न.वि.-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (न.वि.-३२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन निर्णय क्रमांक-जीएसटी-२०१८/प्र.क्र.१६/न.वि.-३२ सोबतचे प्रपत्र-अ

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नाव | मंजूर अनुदान (रु. कोटी) |
|---|---|---|
| १ | नागपूर | ५२.५७ |
| २ | चंद्रपूर | ४.८९ |
| ३ | अमरावती | ९.७९ |
| ४ | अकोला | ५.३६ |
| ५ | औरंगाबाद | २१.१२ |
| ६ | परभणी | १.४५ |
| ७ | लातूर | १.१२ |
| ८ | नांदेड-वाघाळा | ६.१० |
| ९ | नाशिक | ७२.८३ |
| १० | मालेगाव | १२.०३ |
| ११ | धुळे | ७.६६ |
| १२ | जळगाव | ९.२२ |
| १३ | अहमदनगर | ६.८४ |
| १४ | पुणे | १३१.०६ |
| १५ | पिंपरी-चिंचवड | १२५.५७ |
| १६ | कोल्हापूर | १०.५२ |
| १७ | सोलापूर | १५.३८ |
| १८ | सांगली | ११.६८ |
| १९ | मिरा भाईंदर | १३.८१ |
| २० | वसई-विरार | २५.१० |
| २१ | भिवंडी-निजामपूर | १९.३९ |
| २२ | उल्हासनगर | १३.९३ |
| २३ | कल्याण-डोंबिवली | १४.१८ |
| २४ | ठाणे | ६०.०० |
| २५ | नवी मुंबई | ८५.४३ |
| २६ | बृहन्मुंबई | ६९९.१३ |
| एकुण | | **१४३६.१६** |